महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये ICT आधारित घन कचरा व्यवस्थापन व संनियंत्रण प्रकल्प मंजुरीबाबत

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: नगरो-२०२२/प्र.क्र.२९६/नवि-३३**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २२ मे, २०२३

**संदर्भ** :-

१. नगर विकास विभागाचा शासन निर्णय क्र.स्वमअ-२०२१/प्र.क्र.१२(३)/नवि-३४, दि. ७/१०/२०२१.
२. स्वच्छ महाराष्ट्र अभियान यांचे पत्र क्र. एसएमडी/एसएमएमयु/एसडब्लूएम/१२८८/२२-२३, दि. १९/०१/२०२३.
३. नगर परिषद प्रशासन संचालनालयाचे पत्र क्र. नपप्रसं/कार्या-१३/२०२३/आयसीटी/१४०, दि. ०६/०१/२०२३.
४. नगर परिषद प्रशासन संचालनालयाचे पत्र क्र. नपप्रसं/आयसीटी टेक्नॉलॉजी/प्र.क्र.८२१/ २०२२/का-७/५८६, दि. ०२/०२/२०२३.

**प्रस्तावना :-**

राज्यातील सुमारे ५०% लोकसंख्या नागरी भागात राहत असून नागरी भागातील स्वच्छतेला शासनाने अनन्य साधारण महत्व दिले असून त्यानुषंगाने विविध नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमधील घन कचरा व्यवस्थापनासाठी प्रथमतः स्वच्छ भारत अभियान आणि आता स्वच्छ भारत अभियान २.० अंतर्गत प्रकल्प मंजूर केले असून त्याची अंमलबजावणी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमार्फत करण्यात येत आहे. शहरातील घन कचरा व्यवस्थापनांतर्गत कचऱ्याचे संकलन, वर्गीकरण, वाहतूक व त्यावर शास्त्रोक्त पध्दतीने प्रक्रिया होणे आवश्यक आहे. शहरातील प्रभावी घन कचरा व्यवस्थापनासाठी कचरा निर्मिती होत असलेल्या प्रत्येक रहिवासी व वाणिज्यिक प्रयोजनाच्या मालमत्तांमधून कचरा संकलन, वर्गीकरण, कचरा गाड्यांची वाहतूक, रस्ते सफाई व सांडपाणी सफाई (liquid Waste cleaning) इ. बाबींचे केंद्रीय पद्धतीने प्रभावी संनियंत्रण होणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने, संदर्भांकित दिनांक ७ ऑक्टोबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये आय.सी.टी. आधारित प्रणालीचा वापर करून त्रयस्थ संस्थांमार्फत घन कचरा व्यवस्थापन व संनियंत्रण करण्यास शासनाने मंजूरी दिली आहे तसेच, या प्रणालीची राज्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये अंमलबजावणी बंधनकारक करण्याचा निर्णय घेतलेला आहे. तथापि, बऱ्याच नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये निधी अभावी सदर प्रणालीची अंमलबजावणी केली जात नाही. सबब, सदर प्रणाली राबविण्यासाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत शासनामार्फत १०० टक्के अनुदान उपलब्ध करून देण्याचा निर्णय दि. ०३ मे, २०२३ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत घेण्यात आला, त्यानुसार पुढीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

१. राज्यातील “ड वर्ग” महानगर पालिका व सर्व नगर परिषद/ नगर पंचायतीमध्ये आय.सी.टी. आधारित प्रणालीचा वापर करून घन कचरा व्यवस्थापन व संनियंत्रणासाठी रु. ५७८.६३ कोटी किंमतीचा प्रकल्प मंजूर करण्यात येत आहे, सदर प्रकल्पाचा घटक निहाय तपशिल खालीलप्रमाणे:

| **अ.क्र.** | **घटक** | **किंमत (रु. कोटी)** |
|---|---|---|
| १ | निर्धारित जागांवरील सफाईसाठी (Identified Cleaning Points) आय.सी.टी. आधारित प्रणाली | ३२५.९४ |
| २ | प्रशिक्षण | ३.४२ |
| ३ | वार्षिक देखभाल (३ वर्ष) | १४६.६८ |
| ४ | प्रकल्प कार्यान्वयनानंतर क्षेत्रीय यंत्रणांना सहाय्य (३ वर्ष) | १४.३३ |
| ५ | वस्तू व सेवा कर | ८८.२६ |
| | **एकूण** | **५७८.६३** |

२. या प्रकल्पाची अंमलबजावणी यंत्रणा नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई राहील व त्यांनी संदर्भाकित दिनांक ०७ ऑक्टोबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयानुसार राज्य स्तरावरून या प्रकल्पाची अंमलबजावणी करावी तसेच प्रकल्पाचे संनियंत्रण करावे.

३. सदर प्रकल्प ३ वर्ष कालावधीत “ड” वर्ग महानगरपालिका व “अ, ब आणि क” वर्ग नगर परिषदा तसेच नगर पंचायतींमध्ये राबविण्यात यावा.

४. या प्रकल्पाकरिता महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना १००% अर्थसहाय्य देण्यात येईल.

५. संदर्भाकित दि. ७ ऑक्टोबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयानुसार आय.सी.टी. आधारित प्रणालीद्वारे घन कचरा व्यवस्थापन व संनियंत्रण करण्यासाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी सदर शासन निर्णयातील दरानुसार केंद्र शासनाच्या अखत्यारीतील (PSU-GoI) पात्र संस्थेसोबत करारनामा करणे अपेक्षित आहे तथापि, या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या प्रकल्पाची राज्य स्तरावरून १००% राज्य अनुदानातून अंमलबजावणी करावयाची असल्यामुळे प्रकल्प अंमलबजावणी बाबतचा सदर करारनामा नगर परिषद प्रशासन संचालनालयाने केंद्र शासनाच्या अखत्यारीतील (PSU-GoI) पात्र संस्थेसोबत करावा. त्याचप्रमाणे, नगर परिषद प्रशासन संचालनालयाने सदर करारनाम्यानुसार सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या आयुक्त / मुख्याधिकाऱ्यांच्या मार्फत प्रकल्पाची अंमलबजावणी करावी तसेच, प्रकल्पाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित कराव्यात.

६. घन कचरा संकलन व व्यवस्थापनाचे केंद्रीय पद्धतीने संनियंत्रण करण्यासाठी प्रकल्पात समाविष्ट असलेल्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमधील कचरा निर्मिती होत असलेल्या प्रत्येक रहिवासी व वाणिज्यिक प्रयोजनाच्या मालमत्तांवर तसेच, सर्व कचरा सफाई व सांडपाणी सफाई (Sweeping and liquid cleaning point) ठिकाणावर एकाच प्रकारचे (Uniform) स्कॅनिफाय कोड लावावे.

७. सदर प्रकल्पाची विदा (Data) तीन वर्षासाठी जपून ठेवावी तसेच, राज्य शासन, नगर विकास विभागाची क्षेत्रीय कार्यालये व सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना प्रत्यक्ष वेळेची (Real Time) माहिती उपलब्ध होण्यासाठी सबंधीतांना लॉगीन आयडी व पासवर्ड उपलब्ध करून दयावा.

८. या प्रकल्पातून निर्माण होणाऱ्या विदेवर (Data) शासनाची मालकी राहील व सदर विदा (Data) या विभागाच्या सर्व्हरवर उपलब्ध करुन दयावा व शासनाच्या पूर्व मान्यतेशिवाय विदेचा वाणिज्यिक /मौद्रिक प्रयोजनासाठी (Commercial / Data Monetisation) उपयोग करता येणार नाही वा त्याचा प्रकल्पाच्या व्याप्तीबाहेर अन्य कोणत्याही प्रयोजनासाठी उपयोग करता येणार नाही. याबाबत नगर विकास विभाग आवश्यकतेनुसार यथोचित निर्णय घेईल.

९. या प्रकल्पाच्या वार्षिक देखभालीचा कालावधी तीन वर्ष असून त्याचे संनियंत्रण करण्यासाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थानिहाय जिल्हा व राज्यस्तरावर Real Time Dashboard तयार करावा.

१०. सदर प्रकल्पांतर्गत झालेल्या कामाचा अहवाल नगर परिषद प्रशासन संचालनालय कार्यालयास वेळोवेळी सादर करण्यात यावा व त्यानुसार झालेल्या कामाची पडताळणी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडून करून घ्यावी व त्यानंतर अनुज्ञेय ठरणाऱ्या रक्कमेचे नगरपरिषद प्रशासन संचालनालय कार्यालयाकडून प्रदान करण्यात यावे. याबाबत या विभागाच्या दिनांक ७ ऑक्टोबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयातील नमूद दर व कार्यपध्दतीनुसार नगर परिषद प्रशासन संचालनालयाकडून मंजूर प्रकल्प किंमतीच्या मर्यादेत देयके अदा करावीत.

११. नगर परिषद प्रशासन संचालनालय कार्यालयाने प्रकल्पाच्या प्रगतीनुसार आवश्यक निधीचा प्रस्ताव शासनास वेळोवेळी सादर करावा, प्रकल्पाच्या आवश्यकतेनुसार महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानातून निधी टप्प्या-टप्प्याने नगरपरिषद प्रशासन संचालनालय कार्यालयास वितरीत करण्यात येईल.

१२. सदर प्रकल्पासाठी आवश्यक रुपये ५७८.६३ कोटी एवढा संपुर्ण निधी महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानातून ३ वर्षाच्या कालावधीत टप्प्या-टप्प्याने उपलब्ध करून दयावा.

१३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०५२२१६३१३९२०२५ असा आहे. हा शासन निर्णय स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRIKANT C ANDGE

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
DN: cn=SHRIKANT C ANDGE, o=Mantralaya, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, email=shrikant.andge@nic.in, c=US
Date: 2023.05.22 16:48:15 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उप मुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. अपर मुख्य सचिव, वित्त, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-१, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-२, नागपूर.
६. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
७. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
८. विभागीय आयुक्त सर्व.
९. आयुक्त तथा संचालक, नगर परिषद संचालनालय, मुंबई.
१०. जिल्हाधिकारी सर्व.
११. आयुक्त, सर्व महानगरपालिका (ड वर्ग).
१२. मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषद/नगरपंचायत.
१३. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी), मुंबई.
१४. कक्ष अधिकारी (नवि-३४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती, नवि-३३.